**महात्मा गांधी राष्टीय ग्रामीण रोजगार हमी योजनेचे काम पाहण्यासाठी "महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र" नावाचे स्वतंत्र आयुक्तालय निर्माण करणे**

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
शासन निर्णय क्रमांक : आकृति-२०१०/प्र.क्र.७३/मग्रारो-३.
दिनांक: १५ सप्टेंबर, २०११.

**प्रस्तावना :-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी अधिनियम महाराष्ट्रामध्ये दि. १ एप्रिल, २००६ पासून तीन टप्प्यात लागू करण्यात आला आहे. दि. १ एप्रिल, २००८ पासून महाराष्ट्रातील सर्व ३३ जिल्ह्यांमध्ये सदर योजना राबविण्यात येत आहे. महाराष्ट्र राज्यात, महाराष्ट्र रोजगार हमी योजना अधिनियम १९७७ राबविण्यात येत होता. महाराष्ट्र शासनाने केंद्र शासनाच्या संपूर्ण कायद्यातील चांगल्या बाबी व रोजगार हमी योजना कायद्याच्या काही चांगल्या बाबी एकत्र करुन रोजगार हमी योजना कायदा १९७७ मध्ये सन २००६ च्या केंद्राच्या कायद्यानुसार काही नवीन बाबींचा समावेश करण्यात आला व महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजना या नावाने नवीन योजना तयार केली. केंद्र शासनाने १०० दिवसांची रोजगार हमी दिलेली असल्यामुळे तेवढ्या कालावधीचा निधी केंद्राकडून प्राप्त होतो. उर्वरित दिवसांसाठी राज्यात रोजगाराची हमी दिलेली असून त्याकरिता आवश्यक निधी राज्य शासनाच्या निधीमधून अदा करण्यात येतो.

इतर राज्यांच्या तुलनेत महाराष्ट्रात महात्मागांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत खर्च कमी होत असल्याने व राज्यात या योजनेला चालना देण्याच्या उद्देशाने महाराष्ट्रात महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजनेचे काम पाहण्यासाठी स्वतंत्र आयुक्तालय निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने आता पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :-**

२. महाराष्ट्रात महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजनेचे काम पाहण्यासाठी या आदेशान्वये स्वतंत्र आयुक्तालय निर्माण करण्यात येत आहे.या आयुक्तालयासाठी एकूण १७ पदे कायम स्वरुपी मंजूर करण्यात येत आहे. यामध्ये मंत्रालयातील मुख्य अभियंता व सह सचिव (रोहयो) हे पद निम्नस्तर करुन अधिक्षक अभियंता असे करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे उप संचालक (सांख्यिकी) हे पद रुपांतरीत करुन सहाय्यक संचालक (लेखा) करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे मंत्रालयातील संशोधन अधिकारी (सांख्यिकी) व संशोधन सहाय्यक (सांख्यिकी) ही चार पदे आयुक्तालयाकडे वर्ग करण्यात येत आहेत .या व्यतिरिक्त इतर १३ पदे

नव्याने निर्माण करण्यात येत आहेत. सदर पदे प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील. आयुक्तालयाचा आकृतीबंध खालीलप्रमाणे राहील.

## आयुक्तालय मग्रारोहयोचा आकृतिबंध

| अ.क्र. | पदाचे नांव | वेतन श्रेणी व ग्रेड पे. | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | आयुक्त (भा.प्र.से) | ३७४००-६७०००-८७०० | १ |
| २ | सह आयुक्त(अधिक्षक अभियंता जलसंपदा) | १५६००-३९१००-७६०० | १ |
| ३ | उप आयुक्त (अधिक्षक कृषि अधिकारी) | १५६००-३९१००-६६०० | १ |
| ४ | सहाय्यक आयुक्त( उप जिल्हाधिकारी) | १५६००-३९१००-५४०० | १ |
| ५ | सहाय्यक आयुक्त (उपमुख्य कार्यकारी अधिकारी) | १५६००-३९१००-५४०० | १ |
| ६ | सहाय्यक संचालक (लेखा) | १५६००-३९१००-५४०० | १ |
| ७ | सहाय्यक वन संरक्षक | ९३००-३४८००-५००० | १ |
| ८ | संशोधन अधिकारी (सांख्यिकी) | ९३००-३४८००-४४०० | १ |
| ९ | संशोधन सहाय्यक (सांख्यिकी) | ९३००-३४८००-४३०० | १ |
| १० | सहाय्यक लेखा अधिकारी | ९३००-३४८००-४३०० | १ |
| ११ | लघु लेखक (उच्च श्रेणी) | ९३००-३४८००-४४०० | १ |
| १२ | लघु लेखक (निम्न श्रेणी) | ९३००-३४८००-४३०० | १ |
| १३ | डाटा एन्ट्री ऑपरेटर | ५२००-२०२००-२००० | २ |
| १४ | लिपिक-टंकलेखक | ५२००-२०२००-१९०० | ३ |
| | **एकूण पदे** | | **१७** |

३. शिपाई, वाहनचालक व इतर आवश्यक कर्मचारीवृंद हे कंत्राटी पध्दतीने नेमून त्यांच्या वेतनावरील खर्च केंद्र शासनाकडून मिळणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा.

४. **आयुक्तालयाची कामे मुख्यतः खालीलप्रमाणे राहतील:-**

- संपूर्ण राज्याकरिता या योजनेचे वार्षिक नियोजन करणे.
- राज्यातील सर्व जिल्ह्यांचे लेबर बजेट दिनांक ३१ डिसेंबर पर्यंत तयार करुन शासनास सादर करणे.
- एमआयएसच्या कार्यप्रणालीनुसार सर्व गाव, तालुका व जिल्हा पातळीवरील प्रत्येक बाबींची माहिती संगणकावर नियमित स्वरुपात त्या त्या कार्यालयाकडून भरुन घेणे.
- एमआयएसचा नियमित अहवाल केंद्र शासनास ऑनलाईन सादर करणे.

- सर्व ग्रामपंचायतीद्वारा या योजनेचे सामाजिक अंकेक्षण करुन घेऊन ती माहिती एमआयएसद्वारा राज्य व केंद्र शासनास सादर करणे.
- सर्व स्तरावरील तक्रारींचे निवारण करण्याबाबत पर्यवेक्षण करणे व अहवाल सादर करणे.
- गाव, तालुका व जिल्हा स्तरावरील सर्व अधिकारी व कर्मचारी यांना प्रशिक्षण देणे, तसेच संबंधित अशाकीय सदस्य उदा. सरपंच, पंचायत समितीचे अध्यक्ष व इतर यांच्याकरिताही प्रशिक्षण कार्यक्रम आयेजित करणे.
- केंद्र व राज्य शासनाकडून राज्य निधीमध्ये प्राप्त झालेला निधी सर्व जिल्ह्यांना वितरीत करणे, निधीचा हिशोब ठेवणे, निधीचे ऑडिट आणि उपयोगिता प्रमाणपत्र मिळविणे, केंद्र शासनास पुढील हप्त्यांचे प्रस्ताव सादर करणे, इ. बाबींचे नियंत्रण करणे.
- मजूरीच्या दरात होणाऱ्या बदलानुसार वेगवेगळ्या विभागाकडून करण्यात येणाऱ्या कामाचे तांत्रिक व आर्थिक मापदंड तयार करुन त्यास शासनाची मान्यता घेणे.
- सर्व विषयांचे लेखा परिच्छेद.
- कंत्राटी पध्दतीने नियुक्त्या करावयाच्या अतिरिक्त मनुष्यबळाचे धोरण शासनाच्या मान्यतेने निश्चित करणे.
- योजनेची प्रसिध्दी व प्रचार करणे.
- बँक व पोष्टाची कामे पाहणे.
- सर्व जिल्हे, व तालुके यांच्याशी परस्पर संपर्क साधणे.
- केंद्र शासनाने नियुक्त केलेले केंद्रिय पर्यवेक्षक, महत्वाच्या व्यक्ती आणि केंद्र व राज्य शासनाच्या अधिकाऱ्यांच्या भेटींचे कामकाज पाहणे.
- संसद समितीला व राज्य रोजगार हमी समितीला आवश्यक ती माहिती पुरविणे व त्याबाबतचे वैधानिक कामकाज पाहणे.
- केंद्र शासनाच्या मागणीनुसार वेळोवेळी आवश्यक ती माहिती देणे.
- केंद्राच्या वेळोवेळी बदलणाऱ्या नवीन कार्यप्रणालीनुसार राज्यात अंमलबजावणी करणे.
- नियमित आढावा बैठकीसाठी दिल्लीला व इतरत्र उपस्थित राहणे.
- संसद व विधानमंडळामध्ये उपस्थित होणाऱ्या बाबींच्या अनुषंगाने माहिती मिळवून राज्य व केंद्र शासनास सादर करणे.
- वरील विषयांव्यतिरिक्त उद्‌भवणाऱ्या सर्व अनुषंगिक बाबींचे कामकाज पाहणे.

५. आयुक्तालयाचे नांव **" महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र "** असे राहील आणि सदर आयुक्तालयाचे मुख्यालय **नागपूर** येथे राहील.

६. सदर आयुक्तालयाचा खर्च "नियोजन विभाग-मागणी क्रमांक ओ-३-मुख्यशिर्षे २५०५-ग्रामीण रोजगार-६०-इतर कार्यक्रम-००१ रोजगार हमी योजना-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०१) (०१) रोजगार हमी योजना (२५०५००२२) " या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

७. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर आदेशामुळे जी पदे रद्द/रुपांतरीत करण्यात आली आहेत त्या पदावरील अधिकारी/कर्मचारी यांना त्या त्या विभागाने/ विभाग प्रमुखानी त्यांच्या नियमित आस्थापनेवर तात्काळ सामावून घ्यावे. सदर आकृतीबंधातील पदावरील अधिकारी/कर्मचारी यांच्या नियुक्त्या संबंधित विभागांनी/विभाग प्रमुखांनी प्रतिनियुक्तीने तात्काळ कराव्यात.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौ. सं.क्र.२८८/११ व्यय-८, दिनांक ०४.०६.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र राज्याच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०९१५१५००५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( बा.बा.नारायणकर )
उप सचिव , महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य.
३) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य.
४) सर्व मंत्री, महाराष्ट्र राज्य.
५) सर्व राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य.
६) मा. मंत्री (रोहयो), यांचे खाजगी सचिव.
७) मा. राज्यमंत्री (रोहयो), यांचे खाजगी सचिव.
८) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व अप्पर मुख्यसचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०) प्रधान सचिव (रोहयो) यांचे स्वीय सहाय्यक.
११) सर्व मंत्रालयीन विभाग
१२) मुख्य अभियंता व सह सचिव (मग्रारोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) सर्व विभागीय आयुक्त,
१४) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून)
१५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१६) अप्पर जिल्हाधिकारी, मुख्यालय जव्हार, जि.ठाणे,
१७) उपायुक्त (मग्रारोहयो), सर्व विभागीय आयुक्त कार्यालय,
१८) उप जिल्हाधिकारी (मग्रारोहयो), सर्व जिल्हाधिकारी कार्यालय. (मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून),
१९) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२०) महालेखापाल -१ (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२१) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२२) महालेखापाल -२ (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२३) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, बांद्रा, मुंबई.

D:\2011\73 -2010\Final Cabinet note GR.lwp

२४) संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२५) आयुक्त, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२६) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, (मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून),
२८) वित्त विभाग, (कार्या-व्यय-८/ वि.सु.-१)
२९) सर्व उप सचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (मग्रारोहयो)
३०) कक्ष अधिकारी (कार्यासन-१४२१/१४२६), नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई,
३१) कार्यासन मग्रारोहयो-१, (सारग्रंथासाठी)
३२) कार्यासन (मग्रारो-३), ( निवडनस्तीसाठी)